**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) मधील शिक्षण सहसंचालक व समकक्ष या पदावर पदोन्नती देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: निसूची-३६२१/प्र.क्र. ६४/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०९ डिसेंबर, २०२१

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शिक्षण सेवा गट अ (प्रशासन शाखा) मधील शिक्षण उपसंचालक पदावर कार्यरत असणाऱ्या खालील नमूद अधिकाऱ्यांना शासनाने मान्य केलेल्या निवडसूचीनुसार शिक्षण सहसंचालक व समकक्ष, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट अ (प्रशासन शाखा) या पदावर एस-२५ रू. ७८८००-२०९२०० अशा सुधारित वेतन संरचनेत ज्येष्ठतेनुसार खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | जातीचा प्रवर्ग | महसूली विभाग | पदोन्नतीच्या पदावरील पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ६ | ७ |
| १ | श्री. नितिन मुरलीधर उपासनी | खुला | कोकण - २ | विभागीय अध्यक्ष, म.रा.मा. व उ.मा. विभागीय शिक्षण मंडळ, मुंबई |
| २ | श्री. अशोक बंडुजी भोसले | खुला | पुणे | सह संचालक, शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे येथे श्री. महेश पालकर यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदावर. |

२. सदर पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित आलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि. २५.०५.२००४ स्थित सेवा ज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि. ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनानुसार देण्यात येत आहेत. तसेच, दिनांक ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून तसेच रिट पिटीशन स्टॅप नंबर १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅप नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर रिट याचिकेत होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून केवळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४. तात्पुरत्या निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या तथापि, पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीसंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

५. सदर पदोन्नतीनुसार संबंधित अधिकाऱ्यास देण्यात आलेली पदस्थापना सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि. १४.०७.२०२१ मधील विभागीय संवर्ग वाटपाच्या तरतूदीनुसार करण्यात आली आहे.

६. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५.१२.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार वरील दोन अधिकाऱ्यांपैकी शिस्तभंग विषयक कार्यवाही सुरू झाली असल्यास अथवा फौजदारी प्रकरण न्यायालयात प्रलंबित असल्यास अथवा विभागीय चौकशी प्रकरणांत दोषी आढळल्यास अशा अधिकाऱ्यास पदोन्नतीच्या पदस्थापनेच्या ठिकाणी पदस्थापना देण्यात येऊ नये.

७. आयुक्त (शिक्षण), पुणे यांनी संबंधित अधिकाऱ्यांस पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी. तसेच संबंधित अधिकारी यांनी पदोन्नती आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे व संबंधित अधिकारी रुजू झाल्याचा दिनांक आयुक्त (शिक्षण) यांनी शासनास कळवावा.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११२०९१४४०५८७५२१ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2021.12.09 14:42:26 +05'30'

**( टि. वा. करपते )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, मुंबई
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

७) मा. विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
८) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९) मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०) मा. मंत्री (शालेय शिक्षण / क्रीडा) यांचे स्वीय सहायक
११) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण / क्रीडा) यांचे स्वीय सहायक
१२) अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
१६) सहसचिव / उपसचिव (विद्यार्थी विकास / शाळा व्यवस्थापन / शिक्षक शिक्षकेतर / प्रशासन / समन्वय / अर्थसंकल्प / क्रीडा ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य. / प्राथमिक / प्रौढ व अल्पसंख्यांक / SCERT / महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२१) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२२) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / प्रौढ)
२३) सर्व अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक / माध्यमिक)
२४) सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२५) निवड नस्ती, कार्यासन प्रशा-२, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६) संबंधित अधिकारी (आयुक्त कार्यालयामार्फत).